

# बेडूक एक खरा मित्र

मॅक्स

बेडूक एक खरा मित्र

मॅक्स





काळे ढग आकाशात जमा व्हायला लागले
होते. सूर्य ढगाआड गेलेला होता





"पाऊस पडायला सुरुवात होत आहे," बेडकाने आनंदाने विचार केला. पावसाचे काही थेंब बेडकाच्या उघड्या अंगावर पडायला लागले होते. बेडकाला पाऊस खूप आवडत होता.

बेडूक आनंदाने नाचायला लागला कारण पावसाचे थेंब मोठे होते आणि ते वेगाने पडत होते. " पाऊस पडत आहे, पाऊस पडत आहे. माझी चड्डी पाण्यात भिजत आहे!" तो मोठ्याने गाणं म्हणत होता.



आकाश आणखी काळे  काळे झाले.आता खूप जोराने पाऊस पडायला लागला होता. बेडकासाठी हा पाऊस खूप होता. तो भिजत भिजत घराकडे धावला.



बेडकाने स्वत:साठी गरम गरम चहा बनवला. पावसाचे थेंब जोराने खिडकीवर आदळत होते.

सलग तीन दिवस चालणाऱ्या पावसामुळे बेडकाला अस्वस्थ व्हायला लागले होते. बदक, डुक्कर आणि ससा यांची त्याला आठवण आली.  त्याने पाऊस पडायला लागल्यापासून त्यांना बघितलच नव्हतं.



पाचव्या दिवशी नदीला पुर यायला लागला. आता बेडकाच्या घरात पाणी घुसायला लागले होते. सुरवातीला बेडकाला गंमत वाटली परंतु नंतर त्याला काळजी वाटायला लागली.



तो घाईने बदकाच्या घरी गेला. तिथेही पूर आला होता. "हे सगळं पाणी कुठून येतं आहे," बदकाने हताशपणे विचारलं.

"नदीचा पुल तुटला आहे", बेडूक ओरडला. " चल डूक्कराच्या घरी जाऊ. "



ते दोघे मोठ्या कष्टाने पाण्यातुन चालत गेले.

डुक्कर पुढच्या खिडकीतून डोकावून पाहत होता.

"माझ्या सगळ्या वस्तु भिजल्या आहेत," तो रडत म्हणाला.



ते खरं होतं. खोलीमध्ये सगळीकडे टेबल, खुर्च्या पाण्यावर तरंगत होते. सगळं अस्थाव्यस्थ पडलेलं होतं.

ते तिथं थांबू शकत नव्हते.

"चला जाऊ आणि सश्याला पाहु," बेडकाने सुचवले.



सश्याचं घर पाण्याच्या मध्यभागी एका बेटावर होतं.

ससा दरवज्या मध्ये उभा होता आणि त्याने आपल्या मित्रांना हात दाखवला.

"आत या," तो ओरडला. "इथे कोरडे आहे".



आतमध्ये  ऊबदार होतं. सश्याला धन्यवाद देत त्यांनी चुल्हीसमोर कपडे वाळवले आणि त्यांच्या घरी आलेल्या पुराबद्ल त्याला सांगितले.

"तुम्ही सगळे इथेच रहा," तो म्हणाला. "माझ्याकडे पुरेशी जागा आहे आणि पुरेसे खाण्याचे पदार्थ आहेत".

सश्याने एक मोठं पातेल भरुन  बनवलेल्या सुपाभोवती ते सर्व बसले. त्यांना खूप भूक लागली होती आणि त्यांनी सगळं खाऊन टाकलं. संध्याकाळी ते आरामात बसले, पाऊस अजुनही खिडकीच्या काचेवर आदळत होता.



सश्याचे पाहुणे म्हणून ते थोडे दिवस तिथंच राहिले. सगळे सोबत असताना ते खूप खुश होते,  परंतु बाहेर पाऊसच पाऊस होता.



नंतर एक दिवस त्यांच्या लक्षात आलं की घरात खूप थोडेच पाव शिल्लक आहेत.

" आपल्याकडे आता अन्न शिल्लक नाही," सश्याने गंभीरपणे घोषित केलं. " जर आपण मदत मागितली नाही तर आपण मरून जाऊ," बदक म्हणाला.

"मला मरायच नाही," बेडूक म्हणाला,"कधीच."



दुसऱ्या दिवशी पावाचा फक्त एकच तुकडा शिल्लक राहिला होता. ते सर्व भुकेने व्याकूळ झाले होते,पण त्यांना माहित होतं काय करायचं ते. बाहेर पाऊस थांबला होता पण पाण्याची पातळी अजुनही वाढलेलीच होती



"मला माहित आहे!" बेडूक ओरडला. " मी त्या टेकडीपर्यंत पोहत जाईल आणि मदत मागेल."

ससा चिंतेत दिसत होता.नदिचा वेग खूप जास्त आहे आणि रस्ता पण खूप दूर आहे," तो म्हणाला." हे खूप धोकादायक आहे." " परंतु मी व्यवस्थित जाईल," बेडूक ऊत्सहाने ओरडला."मी आपल्यामध्ये सगळ्यात चांगलं पोहतो. त्यांना माहित होतं की हे खरं आहे.



बेडूक मोठ्या धाडसाने पाण्यात उतरला. त्याचे मित्र निराश होऊन बघत होते. थोड्याच वेळात तो दिसेनासा झाला.

पाणी खूपच थंड होते, बेडकाने त्याचा विचार केला नाही. त्याने बदक,ससा आणि डूकराचा विचार केला जे खूप भुकेले होते.



बेडूक जसजसा पुढे पोहत जात होता तसतसा पाण्याचा वेग वाढत होता. बेडूक खूप थकला होता. पुढे पोहत जाणं त्याच्यासाठी खूप अवघड झालं होतं.

अचानक पाण्याच्या वेगाने त्याला मागे ढकललं.



बेडूक बुडायला लागला.

" मी फक्त एक बेडूक आहे जो आता पुढे पोहू शकत नाही", बेडकाने  विचार केला.

" मी बुडून जाणार. मी आता मरणार आहे आणि मी माझ्या मित्रांना पुन्हा बघु शकणार नाही."



नंतर एक ओळखीचा आवाज आला, " इथे काय आहे!"  दोन मजबूत हातांनी बेडकाला पाण्यातुन बाहेर काढलं आणि बोटित ठेवलं. तो उंदीर होता. बेडकाने उंदराला पाऊस, पूर, भूक आणि मदत मिळविण्यासाठी त्याला कसं बाहेर पडावं लागलं हे सगळं सांगितलं.



" काळजी करू नकोस," उंदीर म्हणाला. "प्रवासासाठी  घेतलेल्या खाण्याच्या  वस्तूंनी माझी बोट भरलेली आहे. सर्वांसाठी पुरेसे खाण्याचे पदार्थ आहे त्यात."

आणि त्याने आपली होडी सश्याच्या घराकडे वळविली, जिथे तिनं मित्र मदत येण्याची वाट बघत होते.



डूक्कर, बदक आणि ससा खूप आनंदित झाले जेव्हा त्यांनी बेडकाला होडीतून येताना पाहिलं. परंतू त्यांच्याबरोबर कोण होतं?

नक्किच तो त्यांचा मित्र उंदीर होता. त्यांचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वास बसत नव्हता.



आणि  उंदराच्या होडीमध्ये खूप सारे खाण्याचे पदार्थ होते. पाव, मध, जाम, भाजीपाला आणि याशिवाय बरंच काही.



उंदीर तु आम्हाला वाचवलं, ससा म्हणाला.

"नाही ", उंदीर म्हणाला. " तुम्ही बेडकाला धन्यवाद द्या. तो भयानक पुरातुन पोहत ,स्वतःचा जीव धोक्यात घालून माझ्यापर्यंत पोहोचला."

त्या सगळ्यांनी बेडकाकडे बघितले. तो अभिमानाने चमकत होता. हे सगळंच खरं नव्हतं, पण तरीही...



तेव्हापासून सगळ्या गोष्टी सुरळीत झाल्या. पुरातुन बचाव  झाल्याचा आनंद त्यांनी साजरा केला आणि त्यात बेडूक हिरो होता.

सूर्य पुन्हा चमकायला लागला होता आणि पाण्याची पातळी कमी व्हायला सुरुवात झाली होती.



काही दिवसांनंतर सगळं पाणी ओसरल होतं.

बेडूक, बदक आणि डुक्कर आपापल्या घरी जाऊ शकत होते.



परंतु सगळंकाही अस्वच्छ आणि चिखलाने माखलेलं होतं.

"काही हरकत नाही," उंदीर म्हणाला आणि त्याच्या मदतीने त्यांनी पूर्वीप्रमाणे ठिक केलं.

परंतु सगळंकाही पूर्वी प्रमाणे ठिक झालेलं नव्हतं.

त्यांच्यापैकी कोणीही हा भयानक पूर कधीच विसरू शकत नव्हते.

**समाप्त**



जेव्हा पाऊस येतो आणि नदिला पुर येतो, बेडूक आणि त्याचे मित्र पुरात अडकतात. तेव्हा बेडूक जो त्यांचा खरा मित्र आहे तो स्वतःचा जीव धोक्यात घालून मित्रांना मदत करतो.

मॅक्स हे एक पुरस्कार विजेते कलाकार आहेत, ज्यांच्या  पुस्तकांमध्ये महत्त्वाचे विषय सभ्य विनोदाच्या साहय्याने मांडलेले असतात.